राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास व वित्त महामंडळ, नवी दिल्ली.
सन २०१४-१५ साठी भागभांडवल अंशदान वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मौआम-२०१४/प्र.क्र.११२/का.८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १८ मार्च, २०१५.

**वाचा -**

**शासन परिपत्रक क्रमांकः वित्त विभाग, अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.९ फेब्रुवारी, २०१५.**

**प्रस्तावना -**

राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास व वित्त महामंडळ, नवी दिल्ली या महामंडळास देशातील अल्पसंख्यांकांच्या विकासाकरिता राबवावयाच्या कार्यक्रमांतर्गत महाराष्ट्र शासनाचा वाटा म्हणून राज्यातील अल्पसंख्यांक लोकसंख्येच्या आधारावर निश्चित करण्यात आलेले रु.३५७८.६२ लाख एवढे भाग भांडवली अंशदान राज्य शासनाने घ्यावयाचे आहे. त्यास अनुसरुन राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास एवंम वित्त निगम, नवी दिल्ली या महामंडळास सन २००२-०३ ते सन २०१३-१४ या आर्थिक वर्षामध्ये भाग भांडवलातील अंशदान म्हणून एकूण रु.२३.२४ कोटी इतके भागभांडवल वितरीत करण्यात आले आहे. आता राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास व वित्त महामंडळ, नवी दिल्ली यांना सन २०१४-१५ या वर्षाकरिता भागभांडवल उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास व वित्त महामंडळ, नवी दिल्ली या महामंडळास सन २०१४-१५ या आर्थिक वर्षामध्ये भाग-भांडवलातील अंशदान देण्यासाठी रु.४५.०० लाख इतकी तरतूद करण्यात आली आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक २ च्या परिपत्रकानुसार मूळ तरतूदीच्या ७५% म्हणजे त्यापैकी रुपये ३३,७५,०००/- (अक्षरी रुपये तेहतीस लाख पंच्याहत्तर हजार फक्त) इतकी तरतूद भाग-भांडवल म्हणून राष्ट्रीय अल्पसंख्यांक विकास व वित्त महामंडळ, नवी दिल्ली या महामंडळास वितरीत करण्यास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे. हे भागभांडवल वितरीत केल्यानंतर राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास व वित्त महामंडळाकडे महाराष्ट्र शासनाचे एकूण वितरीत भागभांडवल रुपये २३.५७ कोटी इतके होईल.

२. उपरोक्त भागभांडवल राष्ट्रीय अल्पसंख्यांक विकास व वित्त महामंडळ, नवी दिल्ली यांना प्रदान करण्यासाठी श्री. सं.सु.गांगुर्डे, अवर सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना “आहरण व संवितरण अधिकारी” आणि श्रीम. ऐनुल अत्तार, सह सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना याबाबतच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर महामंडळास उक्त रक्कम एक रकमी पध्दतीने त्वरीत अदा करण्यात यावी.

३. सदर रक्कमेचा ई.सी.एस. (E.C.S.) अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे नावे काढण्यात यावा.

४. वरील भागभांडवली अंशदानाच्या अनुषंगाने होणारा खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक झेडई-२,
४२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण यावरील भांडवली खर्च,
०२, समाजकल्याण,
१९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूक (योजनांतर्गत),
राज्य योजनांतर्गत योजना,
(०१) महामंडळांना सहाय्य
(०१)(०३) राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास व वित्त महामंडळाला भाग भांडवली अंशदान,
(४२३५ ०२४२)
३२ अंशदान

५. हा शासन निर्णय, नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५३/१४७५, दि. ३०.१.२०१५ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक १९०/१५/व्यय-४, दि.५.३.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१२१०४९१५६६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samir Ramesh Salunkhe

Digitally signed by Samir Ramesh Salunkhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samir Ramesh Salunkhe
Date: 2015.03.18 15:23:31 +05'30'

**( समीर साळुंखे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व परीक्षा ), मुंबई/नागपूर
३) व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास एवंम वित्त महामंडळ, नवी दिल्ली
४) सह सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

५) अवर सचिव (रोख शाखा), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी कृपया सदर रक्कमेचा धनादेश "Managing Director, National Minorities Development & Finance Corporation, New Delhi" या नावाने संबंधिताना देण्यात यावा.

६) व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई

७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (रोख शाखेमार्फत)

८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

९) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मुंबई

१०) वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४, व्यय -४ व साउ) मंत्रालय, मुंबई

११) नियोजन विभाग (कार्या.१४७५)

१२) रोख शाखा व का.७, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१३) निवड नस्ती, का.८